**महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळातील अधीक्षक, गट-ब (अराजपत्रित), वरिष्ठ लिपिक व ग्रंथालयीन सहायक, गट-क या पदांचे सेवाप्रवेश नियमात सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
मराठी भाषा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : विश्वसे-२०१४/प्र.क्र.१७/२०१४/आस्था-२,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ जून, २०१७.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या अधीक्षक, गट-ब (अराजपत्रित), वरिष्ठ लिपिक व ग्रंथालयीन सहायक, गट-क या पदांच्या दि.६ जून, १९७२ रोजी संविधानाच्या अनुच्छेद-३०९ अंतर्गत प्रसिध्द केलेल्या सेवाप्रवेश नियमामध्ये करावयाची सुधारणा सोबतच्या अधिसूचनेत (इंग्रजी व मराठी) दर्शविल्याप्रमाणे शासन विहित करीत आहे.

२. उपरोक्त अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या असाधारण राजपत्रात स्वतंत्ररित्या प्रसिध्द करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक **२०१७०६०११६४४२४२२३३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aparna Arvind Gawde
Digitally signed by Aparna Arvind Gawde
Date: 2017.06.05 17:19:04 +05'30'

**(अपर्णा अ.गावडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई.

मा.राज्यपाल यांचे परिवार प्रबंधक, मुंबई.

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.

सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

सर्व अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने).

सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.

सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई (पत्राने).

सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई.

निवड नस्ती.

**अधिसूचना**

मराठी भाषा विभाग,
मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १ जून,२०१७.

**भारताचे संविधान**

क्रमांक : विश्वसे-२०१४/प्र.क्र.१७/२०१४/आस्था-२ - भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन आणि अधीक्षक, वरिष्ठ लिपिक व ग्रंथालयीन सहायक या पदांच्याबाबतीत करण्यात आलेल्या सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश यांचे अधिक्रमण करुन, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, महाराष्ट्र शासनाच्या, मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळामधील अधीक्षक, गट-ब (अराजपत्रित), वरिष्ठ लिपिक व ग्रंथालयीन सहायक, गट-क पदांच्या सेवाप्रवेशाचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहेत, ते असे :-

(१) या नियमांस, मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळातील अधीक्षक, गट-ब (अराजपत्रित), वरिष्ठ लिपिक व ग्रंथालयीन सहायक, गट-क (सेवाप्रवेश) नियम, २०१७ असे म्हणावे.

(२) या नियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,-

(अ) "**मंडळ**" याचा अर्थ, शासनाच्या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ असा आहे;

(ब) "**पदवी**" याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदवी असा आहे;

(क) "**विभाग**" याचा अर्थ, शासनाचा मराठी भाषा विभाग असा आहे;

(ड) "**ग्रंथालय संचालनालय**" याचा अर्थ, शासनाच्या उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील ग्रंथालय संचालनालय असा आहे;

(इ) "**शासन**" याचा अर्थ, महाराष्ट्र शासन असा आहे;

(ई) "**उच्च माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा**" याचा अर्थ, महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा.४१) अन्वये प्रस्थापित केलेल्या विभागीय मंडळाने नियंत्रित केलेली उच्च माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा आणि यामध्ये या परीक्षेस समकक्ष म्हणून घोषित केलेल्या इतर परीक्षा अंतर्भूत आहेत.

(३) मंडळामधील **अधीक्षक**, **गट-ब** (**अराजपत्रित**), पदावरील नियुक्ती, खालील मार्गाने करण्यात येईल-

(अ) मंडळातील वरिष्ठ लिपिक हे पद धारण करणाऱ्या व या पदावर किमान तीन वर्षे नियमित सेवा पूर्ण केलेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने; किंवा

(ब) मंडळामधील अधीक्षक पदावर पदोन्नतीसाठी योग्य व पात्र व्यक्ती उपलब्ध नसल्यास शासनाच्या कोणत्याही कार्यालयातील समकक्ष पद धारण करणाऱ्या व प्रशासकीय कामाचा किमान ३ वर्षे इतक्या कालावधीचा अनुभव असलेल्या योग्य व्यक्तीच्या प्रतिनियुक्तीने;

(४) मंडळामधील **वरिष्ठ लिपिक**, **गट-क**, पदावरील नियुक्ती, मंडळातील लिपिक-टंकलेखक हे पद धारण करणाऱ्या व या पदावर किमान तीन वर्षे इतकी नियमित सेवा पूर्ण केलेल्या व्यक्तींमधून ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीने करण्यात येईल.

(५) मंडळामधील **ग्रंथालयीन सहायक**, **गट-क**, पदावरील नियुक्ती, पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करण्यात येईल,-

(एक) ज्यांचे, वय अडतीस वर्षापेक्षा अधिक नाहीः

परंतु, आधीपासून शासकीय सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा पाच वर्षांपर्यंत शिथिल करण्यात येईल. शासन सेवेतील मागासवर्गीय कर्मचाऱ्यांना ५ वर्षे शिथिलतेची सवलत ते शासन कर्मचारी किंवा मागासवर्ग म्हणून त्यापैकी केवळ एकाच कारणाकरिता उपलब्ध राहील;

(दोन) ज्यांनी, उच्च माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण केली आहे; आणि

(तीन) ज्यांनी, ग्रंथालय संचालनालयाचे ग्रंथपालनाचे प्रमाणपत्र धारण केले आहे;

परंतु असे की, वरील (दोन) व (तीन) येथील अर्हतेसह मराठी विषयातील पदवी धारण करणाऱ्या उमेदवारास प्राधान्य देण्यात येईल.

(६) नियम ३, ४ व ५ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीस, प्रशिक्षण धोरणानुसार शासन वेळोवेळी विहित करेल ते प्रशिक्षण घेणे आवश्यक राहील.

(७) नियम ३, ४ व ५ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीस, त्याबाबतीत केलेल्या नियमानुसार मराठी व हिंदी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केलेली नसेल किंवा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळालेली नसेल तर, त्याला सदर परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(८)	नियम ३, ४ व ५ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीने, महाराष्ट्र शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाकडून वेळोवेळी विहित केलेले "संगणक हाताळणीबाबतचे प्रमाणपत्र" धारण करणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
Date: 2017.06.05 17:17:45 +05'30'

**(अपर्णा अ.गावडे)**
**शासनाचे उप सचिव**

## NOTIFICATION

Marathi Language Department,
Madam Cama Road,
Hutatma Rajguru Chowk,
Mantralaya, Mumbai 400 032.
Dated the 1st June, 2017.

Constitution of India.

No.VRR-2014/CR17/2014/Astha-2 - In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules, orders or instruments made regarding posts of Superintendent, Senior Clerk and Library Assistant, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules regulating recruitment to the posts of Superintendent, Group B (Non-Gazetted), Senior Clerk and Library Assistant, Group C in the Maharashtra State Board of Production of Marathi Vishwakosh under the administrative control of Marathi Language Department of the Government of Maharashtra, namely:-

1. These rules may be called the Superintendent, Group B (Non-Gazetted), Senior Clerk and Library Assistant, Group C, in the Maharashtra State Board of Production of Marathi Vishwakosh under the administrative control of the Marathi Language Department (Recruitment) Rules, 2017.

2. In these rules, unless the context requires otherwise,-

(*a*) "Board" means the Maharashtra State Board of Production of Marathi Vishwakosh under the administrative control of the Department of the Government;

(*b*) "degree" means a degree of a statutory University;

(*c*) "Department" means the Marathi Language Department of Government;

(*d*) "Directorate of Libraries" means the Directorate of Libraries under the administrative control of Higher and Technical Education Department of the Government;

(*e*) "Government" means the Government of Maharashtra;

(*f*) "Higher Secondary School Certificate Examination" means the Higher Secondary School Certificate Examination conducted by a Divisional Board established under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education Boards Act, 1965 (Mah. XLI of 1965) and includes any other examination declared by the Government to be equivalent thereto.

3. Appointment to the post of Superintendent, Group B (Non-Gazetted), in the Board shall be made either,-

*(a)* by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Senior Clerk in the Board having not less than three years regular service in that post; or

*(b)* if a person having three years regular service in the post of Senior Clerk in the Board is not available then by deputation of a suitable person holding equivalent post in any office of the Government and having minimum three years administrative experience.

4. Appointment to the post of Senior Clerk, Group C, in the Board shall be made by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Clerk-cum-Typist in the Board, having not less than three years regular service in that post.

5. Appointment to the post of Library Assistant, Group C, in the Board shall be made by nomination from amongst the candidates who,-

*(i)* are not more than thirty-eight years of age:

Provided that, the upper age limit may be relaxed upto five years in case of candidates already in the Government Service. In case of persons of backward category who are already in Government service can get relaxation of five years either as Government servant or backward category candidate;

*(ii)* have passed Higher Secondary School Certificate

Examination; and

*(iii)* possess a certificate in librarianship from Directorate of Libraries;

Provided that, preference shall be given to a candidate who along with qualification mentioned in *(ii)* and *(iii)* above possess degree in Marathi.

6. A person appointed to the posts mentioned in rules 3, 4 and 5 shall be required to complete the training prescribed for the post according to training policy prescribed by Government, from time to time.

7. A person appointed to the posts mentioned in rules 3, 4 and 5, shall be required to pass examinations in Marathi and Hindi languages according to the rules made in that behalf, unless he has already passed or has been exempted from passing those examinations.

8. A person appointed to the posts mentioned in rules 3, 4 and 5 should possess a Certificate in Computer Operation prescribed by the Directorate of Information Technology, Government of Maharashtra, from time to time.

By order and in the name of the
Governor of Maharashtra,

Aparna
Arvind
Gawde

Digitally signed by
Aparna Arvind Gawde
Date: 2017.06.05
17:18:27 +05'30'

(Aparna A Gawade)
Deputy Secretary to Government.